अवर सचिव पदावरून उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप-१३२२/प्र.क्र.१०९/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ जून २०२३.

**आदेश**

अवर सचिव संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना (गट-अ-वेतनश्रेणी एस-२३-रू.६७७००-२०८७००) या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव (गट-अ-वेतनश्रेणी एस-२५-रू.७८८००-२०९२००) या संवर्गात तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती प्रतिभा माधव पाटील | इ.मा.व. | नगर विकास विभाग | कृषि व पदुम विभाग |
| २ | श्री. अंबादास साहेबराव चंदनशिवे | अ.जा. | मृद व जलसंधारण विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ३ | श्री. अजिंक्य वसंत बगाडे | अ.जा. | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग प्रतिनि- अतिरिक्त आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका | प्रपत्र बढती. अतिरिक्त आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका या पदावर |
| ४ | श्रीमती राजश्री राहूल सारंग | इ.मा.व. | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| ५ | श्रीमती श्रद्धा देवेन कोचरेकर | इ.मा.व. | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ६ | श्री. संतोष उमेशराव गायकवाड | अ.जा. | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | वित्त विभाग |
| ७ | श्री. अजित जगन्नाथ खंदारे | अ.जा. | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ८ | श्रीमती अश्विनी भिमराव यमगर | भज-क | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | कृषि व पदुम विभाग |
| ९ | श्री. अमोल शामसुंदर मुत्याल | अ.ज. | नगर विकास विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| १० | श्रीमती मनिषा युवराज कामठे | अ.जा. | विधि व न्याय विभाग | वित्त विभाग |

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ११ | श्री. प्रफुल्ल जयराज ठाकूर | अ.ज. | इतर मागास व बहुजन कल्याण विभाग प्रतिनि-महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई. | प्रपत्र बढती व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई या पदावर |
| १२ | श्री. सुभाष बबन इंगळे | खुला | सामान्य प्रशासन विभाग प्रतिनि- पिंपरी चिंचवड महानगरपालिका | प्रपत्र बढती उप आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका या पदावर |
| १३ | श्री. प्रसाद महादेव महाजन | खुला | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | नियोजन विभाग |

२. श्री. अजिंक्य वसंत बगाडे, श्री. प्रफुल्ल जयराम ठाकूर, श्री. सुभाष बबन इंगळे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार तात्पुरत्या स्वरूपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर सदर अधिकाऱ्यांनी मंत्रालयीन विभागात हजर होणे आवश्यक राहील.

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब यांच्या शासन निर्णय दि.७.५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

४. सदर अधिकाऱ्यांना उप सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.-

अ) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

आ) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

इ) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यासाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

(ई) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती संपुष्टात येईल.

(उ) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(ऊ) सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालयाने पारीत केलेल्या दि.६.८.२०१८

रोजीच्या आदेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र.२५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(ए) सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७८/२०२१ यामधील आय.ए.(स्टॅम्प) क्र. १०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी, हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून तीस दिवसामध्ये उप सचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे. संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना विहित मुदतीत कार्यमुक्त करावे.

६. पदोन्नत अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने उप सचिव पदावर रूजू करून घेऊन त्याबाबतच्या आदेशाची प्रत या विभागास तात्काळ पाठवावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२७१९४२४६६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.06.27 19:44:54 +05'30'

**(वि.बा.माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव .
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव- सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग.
५. आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका.
६. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई.
८. संबंधित मंत्रालयीन विभाग (आस्थापना).
९. संबंधित अधिकारी, विभागामार्फत.
१०. निवडनस्ती कार्या.१४.